**शिक्षा झालेल्या ६० वर्षांवरील अशक्त महिला बंद्यांना कारागृहातून मुक्त करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय, क्रमांक-आरएलपी-२००५ / प्र.क्र.८२ / पीआरएस-३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : २१ मार्च २००५.

**पहावे :** शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-एमआयएस-४५९९ /५ /२७६ / पीआरएस-३, दिनांक ३१ डिसेंबर १९९९.

**शासन निर्णय :** राज्यातील विविध कारागृहात शिक्षा भोगत असलेल्या ६० वर्षे वयावरील अशक्त महिला बंद्यांच्या मुदतपूर्व मुक्ततेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन आता असे आदेश देत आहे की, जन्मठेपेच्या ज्या ६० वर्षांवरील महिला बंद्यांनी निव्वळ १४ वर्षांची शिक्षा भोगलेली आहे, तसेच इतर शिक्षा झालेल्या ज्या सिध्ददोष महिला बंद्यांनी मा. न्यायालयाने दिलेल्या शिक्षेपैकी अर्धी शिक्षा ( किमान ३ वर्षे ) भोगली आहे अशा, महाराष्ट्र राज्यात शिक्षा झालेल्या व महाराष्ट्र राज्यातील विविध कारागृहात किंवा इतर राज्यातील कारागृहात शिक्षा भोगत असलेल्या ६० वर्षांवरील सिध्ददोष अशक्त महिला बंद्यांना उर्वरित शिक्षा माफ करुन तात्काळ मुक्त करण्यात यावे.

या ठिकाणी असे स्पष्ट करण्यात येते की, मा. न्यायालयाने दिलेल्या शिक्षेपैकी अर्धी शिक्षा किंवा किमान ३ वर्षे यापैकी जो कालावधी अधिक असेल तेवढ्या कालावधीची शिक्षा भोगणे आवश्यक राहील.

सदर निर्णय खालील प्रवर्गातील महिला बंद्यांना लागू राहणार नाही :-

१) जन्मठेप शिक्षा भोगत असलेल्या ज्या महिला बंद्यांनी निव्वळ १४ वर्षे शिक्षा भोगलेली नाही अशा महिला बंदी.
२) एम.पी. डी.ए., टाडा, एन.डी.पी.एस. इत्यादी तसेच केंद्र शासनाच्या अखत्यारितील स्थानबध्दतेच्या कायद्यान्वये शिक्षा झालेल्या महिला बंदी.
३) ३ वर्षापर्यंत शिक्षा झालेल्या महिला बंदी.

सदर शासन निर्णय फौजदारी प्रक्रिया संहिता कलम ४३२ (१) अन्वये शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( पु. रा. हरचांदे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
मा. राज्यमंत्री (तुरुंग) यांचे खाजगी सचिव.
मुख्य सचिव.
अपर मुख्य सचिव ( गृह ), गृह विभाग.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व कारागृह उपमहानिरीक्षक.
सर्व अधीक्षक मध्यवर्ती कारागृह / जिल्हा कारागृह / खुले कारागृह /
खुली वसाहत, आटपाडी, जिल्हा - सांगली.

****

एच-1077(1000-3-05).